सहाय्यक अभियंता श्रेणी-२ गट-ब (राजपत्रित) संवर्गातून सहाय्यक विद्युत निरीक्षक, गट-अ (राजपत्रित) पदावर पदोन्नतीने पदस्थापना.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन आदेश क्रमांक- मुविनि-२०२०/प्र.क्र.१५५/(२५)/ऊर्जा-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १६ ऑक्टोबर, २०२०.

## शासन आदेश

विद्युत निरीक्षणालयातील सहाय्यक अभियंता श्रेणी-२, गट-ब (राजपत्रित) या संवर्गातून सहाय्यक विद्युत निरीक्षक, गट-अ (राजपत्रित) या पदावर पदोन्नतीसाठीच्या सन २०१९-२० च्या निवडसूचीतील खालील तक्त्यामध्ये नमूद केलेल्या सहाय्यक अभियंता श्रेणी-२, गट-ब (राजपत्रित) वेतनश्रेणी एस-१५: ४१८००-१२२३००) यांना सहाय्यक विद्युत निरीक्षक, गट-अ (राजपत्रित) वेतनश्रेणी एस-२०: ५६१००-१७७५००) पदावर या आदेशान्वये विहित अटींच्या अधिनतेने निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे. तसेच सदर सहाय्यक अभियंता श्रेणी-२ यांची पदोन्नतीनंतरची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ-७ मध्ये दर्शविण्यात आलेल्या ठिकाणी या आदेशान्वये करण्यात येत आहे.

| अ. क्र. | ज्येष्ठता क्र. | अधिकाऱ्याचे नाव | अधिकाऱ्याचा स्वत:चा प्रवर्ग | पदोन्नतीचा प्रवर्ग | वाटप करण्यात आलेला महसूली विभागीय संवर्ग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | २९ | श्री. तन्वीर गुलाब शेख, सहाय्यक अभियंता श्रेणी-२ | इ. मा. व. | खुला | औरंगाबाद- (६) | सहाय्यक विद्युत निरीक्षक, अधीक्षक अभियंता, औरंगाबाद प्रादेशिक विद्युत निरीक्षण मंडळ, औरंगाबाद यांचे कार्यालय, औरंगाबाद या रिक्त पदी |

२. उपरोक्त अधिकाऱ्यास खालील अटींच्या अधिन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे.

(१) सदर पदोन्नती/ निवडसूची महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेने नियमित केल्यानंतर पदोन्नतीच्या पदावर सेवाज्येष्ठता व अन्य सेवाविषयक लाभ मिळण्यास पदोन्नत अधिकारी पात्र ठरेल.

(२) उपरोक्त पदोन्नती मा. सर्वोच्च न्यायालयात प्रलंबित विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ मधील अंतिम निर्णयाच्या अधिन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खुल्या प्रवर्गात रिक्त असलेल्या पदावर देण्यात येत आहे.

(३) उपरोक्त पदोन्नती मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल मूळ अर्ज क्र.११९२/२०१९ सोबत संकीर्ण अर्ज क्र. ११५/२०२० तसेच मूळ अर्ज क्र.४८३/२०२० सोबत संकीर्ण अर्ज क्र. २२१/२०२० मध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

(४) सदर अधिकाऱ्यास देण्यात येणारी तदर्थ पदोन्नती ही त्यांच्या विरुध्द आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरु झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहेत.

(५) सदर पदोन्नत अधिकाऱ्यांची नियुक्ती करताना देण्यात आलेली कागदपत्रे व तद्नंतर विहित मुदतीत व संधीमध्ये आवश्यक व्यावसायिक परीक्षा, संगणक परीक्षा, हिंदी भाषा परीक्षा, मराठी भाषा परीक्षा इ. उत्तीर्ण झाले आहेत अथवा उत्तीर्ण होण्यापासून सूट नियमानुसार अनुज्ञेय ठरुन त्याबाबतची योग्य नोंद सेवापुस्तकात घेण्यात येऊन त्या नियमानुसार आहेत या धारणेच्या अधीन राहून पदोन्नती देण्यात येत आहे.

(६) सदर अधिकाऱ्याने सहाय्यक विद्युत निरीक्षक, गट-अ (राजपत्रित) पदावरील निव्वळ तात्पुरती पदोन्नती न स्विकारल्यास शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/कार्यासन-१२, दि. १२.०९.२०१६ मधील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात येईल.

(७) मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांनी स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन पदोन्नतीने नियुक्त झालेल्या अधिकाऱ्यास त्वरित कार्यमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत सूचना दयाव्यात. तसेच संबंधित अधिकारी पदोन्नतीच्या पदावर रुजू झाल्याचा अहवाल मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांनी शासनाकडे तात्काळ सादर करावा.

(८) पदोन्नतीने नियुक्ती दिलेल्या वरील अधिकाऱ्याने त्यांच्या नवीन नेमणूकीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. त्यांनी अनाधिकृतरित्या रजेवर जावू नये किंवा पदस्थापनेत बदल करण्यासाठी निवेदन/ अर्ज देऊ नये. तसे केल्यास, ते महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ च्या नियम २३ चे उल्लंघन झाल्याने शिस्तभंगविषयक कार्यवाहीस पात्र ठरतील, यांची त्यांनी नोंद घ्यावी.

(९) उपरोक्त अधिकारी ज्या दिनांकास पदोन्नतीच्या पदावर रुजू होतील त्या दिनांकापासून त्यांना पदोन्नती विषयक लाभ अनुज्ञेय होतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२०१०१६१९३७१७७८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Pundlik Badgeri

Digitally signed by Prashant Pundlik Badgeri
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=07ae22a8e7fa4047ce6ff816d85e77eec14db9926b325a140acf9b28bb990786, serialNumber=ec955e2d360e1fddb6abac58a907419053beeceb5dbac48a78c89c588ff71bef, cn=Prashant Pundlik Badgeri
Date: 2020.10.16 19:39:13 +05'30'

**(प्र. पुं. बडगेरी)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, प्रशासकीय इमारत, तिसरा मजला, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर, मुंबई-४०००७१.
२. अधीक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत निरीक्षक मंडळ, मुंबई/पुणे/ औरंगाबाद/नागपूर.
३. श्री. तन्वीर गुलाब शेख, सहाय्यक अभियंता श्रेणी-२ (मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांच्यामार्फत)

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद/ विधानसभा, विधानभवन, मुंबई.
६. सर्व मा. संसद सदस्य/ विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
११. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
१२. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१६. उपसचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. निवडनस्ती (ऊर्जा-५).